नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी १०२ अस्थायी पदे निर्माण करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१४/प्र. क्र. १३५/ई-८,

३२ वा मजला, सेंटर क्र.१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड,कुलाबा, मुंबई-४०० ००५.
तारीख: ३१/०७/२०१४.

**पहा-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र. क्र.६६(भाग-२)/ई-८, दिनांक २०/०३/२००६.
२) अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्रमांक-प्राफेब-११०८/प्र. क्र.१६७/ठाणे/म-१०, दिनांक १७/०६/२०१४.
३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांचे क्रमांक मशा/ कार्या-१/ इएनजी/ठाणे जि. वि./२०१४, दि.०५/०७/२०१४ चे पत्र.
४) वित्त विभागाचे पत्र क्र.पदनि-२०१४/प्र. क्र.५०/१४/विसु-१, दि.२८ /०७/२०१४.

**प्रस्तावना**

महसूल व वन विभाग, क्रमांक-प्राफेब-११०८/प्र. क्र.१६७/ठाणे/म-१०, दिनांक १७/०६/२०१४ च्या अधिसूचना अन्वये ठाणे जिल्ह्याचे विभाजन करुन दि.०१/०८/२०१४ पासून पालघर, वसई, डहाणु, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड या तालुक्यांचा समावेश करुन नवनिर्मित पालघर जिल्हा निर्माण केला असून त्याचे मुख्यालय पालघर येथे ठेवण्यात आले आहे.

महसूल विभागाच्या नियंत्रणाधीन क्षेत्रिय स्तरावरील कार्यालयाकरीता अधिकारी/कर्मचारी यांच्या पदांचा आकृतीबंध दिनांक २०/०३/२००६ च्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे. सदर आकृतीबंध निश्चित करताना जिल्ह्यांचे भौगोलिक क्षेत्र, लोकसंख्या, नागरी क्षेत्र व खातेदारांची संख्या हे निकष विचारात घेण्यात आले आहेत. त्यानुसार ३५ जिल्ह्यांची विभागणी मोठे, मध्यम व लहान जिल्हे अशी करण्यात येवून मोठ्या जिल्ह्यासाठी १५०, मध्यम जिल्ह्यासाठी १०२, व लहान जिल्ह्यासाठी ७० पदे निश्चित करण्यात आली आहेत.

दिनांक १९/०७/२०१४ रोजी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीमध्ये याबाबत सविस्तर चर्चा करण्यात येवून नवनिर्मित पालघर जिल्ह्याचा समावेश मध्यम जिल्हा म्हणून करण्यात यावा आणि पालघर जिल्हाधिकारी कार्यालयासाठी १०२ पदांच्या निर्मितीस मान्यता दर्शविली आहे. त्यानुसार आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

महसूल क्षेत्रिय कार्यालयाकरीता महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र. क्र.६६(भाग-२)/ई-८, दिनांक २०/०३/२००६ अन्वये आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर आकृतीबंधामध्ये मध्यम जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी कार्यालयाकरीता १०२ पदे निश्चित करण्यात आली आहेत.

२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने उच्चस्तरीय सचिव समितीने दि.१९/०७/२०१४ रोजीच्या बैठकीमध्ये दर्शविलेल्या मान्यतेनुसार नवनिर्मित पालघर जिल्हा हा मध्यम जिल्हा म्हणून घोषित करण्यात येत असून या जिल्हाधिकारी कार्यालयासाठी खाली नमुद केलेली १०२ अस्थायी पदे नव्याने निर्माण करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | संवर्गनिहाय पदे | वेतन श्रेणी रुपये | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | ३७,४००-६७,००० (ग्रेड पे ८७००) | १ |
| २. | अपर जिल्हाधिकारी | १५,६००-३९,१०० (ग्रेड पे ७६००) | १ |
| ३. | उप जिल्हाधिकारी | १५,६००-३९,१०० (ग्रेड पे ५४००) | २ |
| ४. | तहसिलदार | १५,६००-३९,१०० (ग्रेड पे ५०००) | २ |
| ५. | नायब तहसिलदार | ९३००-३४,८०० (ग्रेड पे ४३००) | ४ |
| ६. | लेखाधिकारी | ९३००-३४,८०० (ग्रेड पे ४४००) | २ |
| ७. | सहाय्यक लेखाधिकारी | ९३००-३४,८०० (ग्रेड पे ४४००) | १ |
| ८. | उपलेखापाल/ जिल्हा लेखापरिक्षक | ९३००-३४,८०० (ग्रेड पे ४२००) | १ |
| ९. | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ९३००-३४,८०० (ग्रेड पे ४४००) | १ |
| १०. | लघुलेखक (निम्न श्रेणी) | ९३००-३४,८०० (ग्रेड पे ४३००) | २ |
| ११. | अव्वल कारकून | ५२००-२०,२०० (ग्रेड पे ३५००) | २६ |
| १२. | लिपिक | ५२००-२०,२०० (ग्रेड पे १९००) | २९ |
| १३. | वाहनचालक | ५२००-२०,२०० (ग्रेड पे १९००) | २ |
| १४. | शिपाई/नाईक/ हवालदार | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | २४ |
| १५. | पहारेकरी | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ३ |
| १६. | स्वच्छक | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३०० ) | १ |
| | | एकूण-- | १०२ |

३) उपरोक्त अस्थायी पदे महसूल व वन विभागाच्या संबंधित कायम संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी. या पदावरील पदधारकांना शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

४) वर नमुद केलेला खर्च मागणी क्रमांक सी-१,२०५३-जिल्हा प्रशासन,(००) ०९३, जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना, (०१) (०१) आयुक्त कोकण, (२०५३ ००२८) ०१ वेतन या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येवून वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

५) सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१८/२०१४/व्यय-०९, दि.३०/०७/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३११५५५४७५५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.07.31 19:24:51 +05'30'

**( चं. नि. पाडळे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.

सर्व विभागीय आयुक्त.

सर्व जिल्हाधिकारी.

जिल्हाधिकारी, ठाणे.

जिल्हाधिकारी, पालघर.

प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, ( लेखा व अनुज्ञेयता ) , मुंबई-२०.

प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, (लेखा परीक्षा), नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ पालघर.

कक्ष अधिकारी, अर्थ-१२, व्यय-९ व वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग, मुंबई.

निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मुंबई-०५